शिधापत्रिका व्यवस्थापन प्रणाली (RCMS) वरील माहितीच्या आधारे राष्ट्रीय अन्नसुरक्षा अधिनियम, २०१३ अंतर्गत जिल्हानिहाय इष्टांकात सुधारणा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः असुका-२०२५/प्र.क्र. १६ / नापु-२८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १ एप्रिल, २०२५

**वाचा :-**

१) शासन निर्णय क्रमांक:- शिवाप-२०१३/प्र.क्र. २८६ / नापु-२८, दि. १७ जुलै, २०१३
२) शासन निर्णय क्रमांक:असुका २०१३/प्र.क्र. ३१९ / नापु-२२, दि. १७ डिसेंबर, २०१३
३) शासन निर्णय क्रमांक- असुका २०१४/प्र.क्र. ११६ / नापु- २२, दि. २४ मार्च, २०१५
४) शासन निर्णय क्रमांक- असुका २०१६/प्र.क्र.१२५/ नापु-२२, दि१३ ऑक्टोबर, २०१६
५) शासन निर्णय क्रमांक- असुका २०१७/प्र.क्र.६० / नापु-२२, दि. ३ मार्च२०१७
६) शासन निर्णय क्रमांक:- असुका २०१८/प्र.क्र१ / नापु-२२, दि. २१ मे, २०१८
७) शासन निर्णय क्रमांक- असुका २०१८/प्र.क्र. १३२ / नापु-२२, दि. १६ नोव्हेंबर, २०१८
८)शासन पत्र क्रमांक:असुका-२०१७ /प्र.क्र. १४८ / नापु- २२, दि. २१ सप्टेंबर२०१७, दि. २४ ऑक्टोबर, २०१७ व दि. ८ जानेवारी, २०२०
९) शासन निर्णय क्रमांक- असुका २०१९/प्र.क्र. ४९/ नापु-२२, दि. २२ फेब्रुवारी२०१९ व दि. ६ जुलै, २०१९.
१०) शासन निर्णय क्रमांक- असुका २०२१/प्र.क्र.६५ / नापु- २२, दि. १५ सप्टेंबर, २०२१.
११) शासन निर्णय क्रमांक- असुका २०२१/प्र.क्र.६६ / नापु- २२, दि. १८ फेब्रुवारी, २०२२.
१२) शासन निर्णय क्रमांक- असुका २०२१/प्र.क्र.८० / नापु- २८, दि. ०४ सप्टेंबर, २०२३.
१३) शासन निर्णय क्रमांक- असुका २०२१/प्र.क्र.८० / नापु- २८, दि. २६ जून, २०२४.

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय अन्नसुरक्षा अधिनियम, २०१३ ची अंमलबजावणी महाराष्ट्र राज्यात दिनांक १ फेब्रुवारी, २०१४ पासून सुरु करण्यात आली आहे. सदर अधिनियमान्वये महाराष्ट्र राज्यासाठी ७६.३२ टक्के ग्रामीण (४६९.७१ लक्ष) व ४५.३४ टक्के शहरी (२३०.४५ लक्ष) अशी एकूण ७००.१६ लक्ष लाभार्थी संख्या निश्चित करण्यात आली आहे.

राष्ट्रीय अन्नसुरक्षा अधिनियम, २०१३ अंतर्गत पात्र लाभार्थ्यांची निवड करण्याकरिता प्रथमतः संदर्भाधीन दिनांक १७.१२.२०१३ च्या शासन निर्णयान्वये ग्रामीण व शहरी भागाकरिता जिल्हानिहाय लाभार्थ्याचा इष्टांक देण्यात आला होता. तद्नंतर संदर्भाधीन दिनांक २४.०३.२०१५ च्या शासन निर्णयानुसार ग्रामीण व शहरी भागाकरिता अंत्योदय अन्न योजना व प्राधान्य कुटुंबातील लाभार्थ्याकरिता स्वतंत्र इष्टांक देण्यात आला होता. राज्यात शिधापत्रिकांच्या संगणकीकरणाची मोहिम राबविताना शिधापत्रिका संगणकीकृत करण्यात आल्यामुळे त्यानुसार लाभार्थ्यांची आकडेवारी विचारात घेऊन संदर्भाधीन दिनांक १३.१०.२०१६ च्या शासन निर्णयान्वये जिल्हानिहाय अद्ययावत इष्टांक देण्यात आला होता.

दिनांक १३.१०.२०१६ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ३०.०९.२०१६ पर्यंतच्या शिधापत्रिकांचा समावेश करण्याबाबत सूचना देण्यात आल्या होत्या. सदर सूचनांच्या अनुषंगाने क्षेत्रिय कार्यालयांकडून दिनांक ३०.०९.२०१६ रोजी कार्यरत असलेल्या शिधापत्रिकेच्या संख्येनुसार दिनांक ०३.०३.२०१७ च्या शासन निर्णयान्वये जिल्हानिहाय सुधारित इष्टांक देण्यात आला. तद्नंतर दिनांक २१.०५.२०१८ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०३.०३.२०१७ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या इष्टांकाची पूर्तता करण्याकरिता दिनांक ३०.०४.२०१८ पर्यंतच्या पात्र शिधापत्रिकाधारकांचा समावेश करण्याबाबत सर्व संबंधितांना सूचना देण्यात आल्या.

दि. ०३.०३.२०१७ च्या शासन निर्णयान्वये दिलेल्या इष्टांकाची पूर्तता केल्यानंतर आवश्यक अतिरिक्त इष्टांक तसेच इष्टांक पूर्ततेअभावी समर्पित करावयाचा इष्टांक याबाबतची माहिती Google Drive पर सादर करण्याबाबत सर्व संबंधितांना कळविण्यात आले होते. Google Drive वर प्राप्त झालेल्या माहितीच्या आधारे दि. १६.११.२०१८ च्या शासन निर्णयान्वये जिल्हानिहाय इष्टांकात सुधारणा करण्यात आली आहे.

दि. १६.११.२०१८ च्या शासन निर्णयान्वये लाभार्थ्यांचा जिल्हानिहाय इष्टांक दिल्यानंतर दि.२२.०२.२०१९ च्या शासन निर्णयान्वये लाभार्थी निवडीसाठी दि.३०.०४.२०१८ ऐवजी दि. १५.०२.२०१९ पर्यंतच्या शिधापत्रिका विचारात घेण्याबाबत (Cut Off Date) निर्णय घेण्यात आला. तद्नंतर दि.०६.०७.२०१९ च्या शासन निर्णयान्वये लाभार्थी निवडीसाठी दि.३०.०४.२०१८ ऐवजी दि. ३०.०६.२०१९ पर्यंतच्या शिधापत्रिका विचारात घेण्याबाबत निर्णय घेण्यात आला. तसेच नजीकच्या काळात दि. १५.०९.२०२१ च्या शासन निर्णयान्वये यापुर्वी निश्चित करण्यात आलेल्या सर्व Cut Off Dates रद्द करण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे. तसेच शिधापत्रिकाधारकांकडून त्यांच्या कुटुंबातील प्रत्येक सदस्यांचे वार्षिक कौटुंबिक उत्पन्न व प्रत्येक सदस्यांचा आधार क्रमांक यासह कुटुंबातील सदस्यांची सविस्तर माहिती दर्शविणारे सुधारीत हमीपत्रदेखील भरून घेण्याच्या सूचना सर्व क्षेत्रीय कार्यालयांना देण्यात आल्या आहेत.

राज्यासाठी दिलेल्या एकूण इष्टांकाची पूर्तता होत नसल्याने अंत्योदय अन्न योजना व प्राधान्य कुटुंब लाभार्थी सदस्यांचा सुधारीत इष्टांक देण्याच्या दृष्टीने शिधापत्रिका व्यवस्थापन प्रणाली (RCMS ) वर Digitisation करण्यात आलेल्या अंत्योदय अन्न योजना शिधापत्रिका व प्राधान्य कुटुंब लाभार्थी संख्येच्या आधारे राष्ट्रीय अन्नसुरक्षा अधिनियम, २०१३ अंतर्गत जिल्हानिहाय सुधारीत इष्टांक दि.१८.०२.२०२२ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला आहे. क्षेत्रीय कार्यालयांची मागणी विचारात घेऊन दि.१८.०२.२०२२ च्या शासन निर्णयान्वये वितरित केलेल्या इष्टांकामध्ये सुधारणा करुन अंत्योदय अन्न योजना व प्राधान्य कुटुंब योजनेच्या इष्टांकाचे सुधारित वाटप दि.०४.०९.२०२३ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आले आहे.

अनेकवेळा निरनिराळ्या पद्धतीने इष्टांकात बदल करूनदेखील इष्टांकाची पूर्तता होत नसल्याने व शिधापत्रिका व्यवस्थापन प्रणाली (RCMS ) वर Digitisation करण्यात आलेल्या अंत्योदय अन्न योजना शिधापत्रिका व प्राधान्य कुटुंब लाभार्थ्यांच्या संख्येचे अवलोकन केले असता अद्यापही विनावापर इष्टांक शिल्लक असल्याचे निदर्शनास आले आहे. त्यामुळे शिधापत्रिका व्यवस्थापन प्रणाली (RCMS ) वर Digitisation करण्यात आलेल्या अंत्योदय अन्न योजना शिधापत्रिका व प्राधान्य कुटुंब लाभार्थी संख्येच्या आधारे जिल्हानिहाय सुधारीत इष्टांक देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

राष्ट्रीय अन्नसुरक्षा अधिनियम, २०१३ अन्वये सवलतीच्या दराने अन्नधान्य मिळण्यासाठी महाराष्ट्र राज्याच्या एकूण लोकसंख्येपैकी ७६.३२ टक्के ग्रामीण व ४५.३४ टक्के शहरी लोकसंख्येची मर्यादा दिली आहे. सबब सुधारीत इष्टांक देताना उपरोक्त मर्यादेसाठी जिल्हा / शहर / गाव हे घटक विचारात न घेता राज्य हा घटक विचारात घेऊन, त्यानुषंगाने राष्ट्रीय अन्नसुरक्षा अधिनियम, २०१३ अंतर्गत योग्य व गरजू लाभार्थी समाविष्ट होण्याच्या दृष्टीने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे :-

**शासन निर्णय :-**

१) संदर्भाधीन दिनांक २६ जून २०२४ च्या शासन निर्णयासोबतचे विवरणपत्र याद्वारे रद्द करण्यात येत आहे.

२) अंत्योदय अन्न योजनेच्या शिधापत्रिकांची व प्राधान्य कुटुंबातील लाभार्थ्यांची निवड करण्याकरिता सोबत जोडलेल्या विवरणपत्रामध्ये प्रत्येक जिल्ह्यासमोर दर्शविलेल्या इष्टांकाच्या आकडेवारीच्या मर्यादेत लाभार्थ्यांची निवड करण्यात यावी.

३) क्षेत्रीय कार्यालयांनी सुधारीत इष्टांकाची पूर्तता करताना वेळोवेळी विहीत केलेल्या कार्यपद्धतीचा अवलंब करावा.

४) दि. १७.०७.२०१३, दि. १७.१२.२०१३, दि. २४.०३.२०१५, दि. १३.१०.२०१६, दि. ०३.०३.२०१७, दि.२१.०५.२०१८, दि. १६.११.२०१८ व दि. १५.०९.२०२१ च्या शासन निर्णयान्वये/परिपत्रकान्वये दिलेल्या सर्वसामान्य सूचना तसेच दि. २१.०९.२०१७, दि.२४.१०.२०१७ व दि. ०८.०१.२०२० च्या शासन पत्रान्वये देण्यात आलेल्या सर्वसामान्य सूचना कायम राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४०११५५९२४३००६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TATOBA MARUTI KOLEKAR

Digitally signed by TATOBA MARUTI KOLEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Food Civil Supplies and Consumer Protection Depart, 2.5.4.20=f6809ddecc0e0507860e37e9935ab3a7013510f4fe04fad27512588a0bc8e15f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9915405908628d01955f3675acc122f51e0c39f63f7cc88eec49cd05616991fd, cn=TATOBA MARUTI KOLEKAR
Date: 2025.04.01 16:00:11 +05'30'

**( ता.मा. कोळेकर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री, गृह यांचे प्रधान सचिव
४. मा. उपमुख्यमंत्री, नियोजन व वित्त यांचे प्रधान सचिव
५. मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
६. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

७. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
८. सर्व विधान परिषद सदस्य व सर्व विधानसभा सदस्य.
९. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र
१०. सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक
११. सर्व मंत्रालयीन विभाग
१२. सर्व विभागीय आयुक्त,
१३. सर्व जिल्हाधिकारी
१४. मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा
१५. नियंत्रक शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई.
१६. वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई
१७. सर्व उपायुक्त (पुरवठा)
१८. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी
१९. सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी
२०. सर्व अधिकारी (सचिव वगळून), अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
२१. सर्व कार्यासने, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
२२. सर्व खाजगी सचिव, मा. मंत्री कार्यालये, मंत्रालय, मुंबई.
२३. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
२४. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, ६वा मजला, विधानभवन, मुंबई
२५. निवडनस्ती (कार्यासन नापु-२८)

*****

| शासन निर्णय क्र. असुका-२०२५/प्र.क्र.१६/नापु-२८, दि. १ एप्रिल, २०२५ सोबतचे विवरणपत्र | | | |
|---|---|---|---|
| अ.क्र. | जिल्हा | राष्ट्रीय अन्नसुरक्षा, अधिनियम, २०१३ अंतर्गत जिल्हानिहाय सुधारित इष्टांक | |
| | | अंत्योदय अन्न योजना ( शिधापत्रिका संख्या) | प्राधान्य कुटूंब लाभार्थी (सदस्य संख्या) |
| १ | अ परिमंडळ | 671 | 6,41,548 |
| २ | ड परिमंडळ | 150 | 8,69,174 |
| ३ | ई परिमंडळ | 1,976 | 19,66,735 |
| ४ | फ परिमंडळ | 10,860 | 26,86,563 |
| ५ | ग परिमंडळ | 1,521 | 10,47,767 |
| | मुंबई-ठाणे शिधावाटप क्षेत्र एकूण | 13,657 | 61,64,020 |
| ६ | ठाणे | 49,153 | 5,07,180 |
| ७ | पालघर | 98,687 | 14,98,175 |
| ८ | रायगड | 82,051 | 15,40,975 |
| ९ | रत्नागिरी | 38,535 | 10,20,307 |
| १० | सिंधुदूर्ग | 21,357 | 5,96,674 |
| ११ | नाशिक | 1,78,735 | 31,24,763 |
| १२ | धुळे | 76,190 | 11,73,227 |
| १३ | जळगांव | 1,35,775 | 22,55,046 |
| १४ | नंदुरबार | 1,07,049 | 7,75,698 |
| १५ | अहिल्यानगर | 88,006 | 26,18,942 |
| १६ | पुणे | 49,373 | 25,24,535 |
| १७ | पुणे शहर | 7,504 | 13,65,837 |
| १८ | सोलापूर | 51,847 | 16,43,969 |
| १९ | सोलापूर शहर | 6,131 | 5,15,994 |
| २० | कोल्हापूर | 52,337 | 23,43,555 |
| २१ | सांगली | 30,918 | 17,67,214 |
| २२ | सातारा | 27,030 | 16,96,259 |
| २३ | छत्रपती संभाजीनगर | 67,521 | 21,34,532 |
| २४ | जालना | 43,879 | 14,21,297 |
| २५ | नांदेड | 79,682 | 20,21,774 |
| २६ | बीड | 39,431 | 15,77,461 |
| २७ | धाराशीव | 38,915 | 10,32,846 |
| २८ | परभणी | 44,832 | 10,92,052 |
| २९ | लातूर | 42,729 | 16,72,147 |
| ३० | हिंगोली | 29,888 | 6,99,059 |
| ३१ | अमरावती | 1,29,466 | 15,56,016 |
| ३२ | वाशिम | 50,801 | 8,35,217 |
| ३३ | अकोला | 45,949 | 11,42,746 |
| ३४ | बुलढाणा | 64,096 | 16,67,463 |
| ३५ | यवतमाळ | 1,35,362 | 15,89,278 |
| ३६ | नागपूर | 82,103 | 15,22,427 |
| ३७ | नागपूर शहर | 46,201 | 15,13,281 |
| ३८ | वर्धा | 50,884 | 9,81,064 |
| ३९ | भंडारा | 67,183 | 7,83,887 |
| ४० | गोंदिया | 83,494 | 7,65,995 |
| ४१ | चंद्रपूर | 1,44,291 | 11,48,318 |
| ४२ | गडचिरोली | 1,02,737 | 4,75,799 |
| **राज्याची एकूण** | | **25,05,300** | **5,98,12,796** |

*****